महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवेतील मुख्याधिकारी गट-ब/ सहायक आयुक्त, गट-ब संवर्गातून मुख्याधिकारी, गट-अ / सहायक आयुक्त, गट-अ संवर्गात निव्वळ तदर्थ स्वरुपात पदोन्नती व पदस्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमसीओ-२०२२/प्र.क्र.१४१/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), चौथा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २५ जुलै, २०२३.

**संदर्भ:- १.** महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१ दि.१४.०७.२०२१.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/कार्या.१२, दि.१५.१२.२०१७ व दि.३०.०८.२०१८.

**शासन आदेश:-**

खालील नमुद अधिकाऱ्यांना मुख्याधिकारी गट-ब/ सहायक आयुक्त, गट-ब (एस-१५ रु.४१८००-१३२३००) संवर्गातून मुख्याधिकारी, गट-अ/सहायक आयुक्त, गट-अ (एस-२० रु.५६१००-१७७५००) संवर्गात निव्वळ तदर्थ स्वरुपात पदोन्नती देऊन त्यांना संदर्भाधिन अधिसूचनेच्या अनुषंगाने वाटप झालेल्या महसूली विभागांतर्गत त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने आदेशाच्या दिनांकापासून ११ महिन्यांसाठी किंवा विभागीय चौकशी/ न्यायालयीन कार्यवाही अंतिम होईल यापैकी जे अगोदर होईल तेवढ्या कालावधीसाठी निव्वळ तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे: -

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | वाटप महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती गिता वंजारी, सहायक आयुक्त, गट-ब, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती. | अमरावती | उपायुक्त, अकोला महानगरपालिका |

२. उपरोक्तप्रमाणे निव्वळ तदर्थ पदोन्नती ही खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे: -

(१) उपरोक्त पदोन्नती विभागीय चौकशी/ न्यायालयीन कार्यवाहीच्या अधिन दिली जात असल्याने, सदर तदर्थ पदोन्नती केवळ तात्पुरती असेल व या तदर्थ पदोन्नतीमुळे नियमितपणाचे व ज्येष्ठतेचे कोणतेही लाभ मिळणार नाही.

(२) ही तदर्थ पदोन्नती "पुढील आदेशापर्यंत असेल" तसेच कोणत्याही वेळी दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करुन मूळ पदावर पदावतन करण्याचा हक्क शासन राखून ठेवीत आहे.

(३) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून सामान्य प्रशासन विभाग(का.१६-ब), शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतूदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर निव्वळ तदर्थ स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या तसेच सामान्य प्रशासन

विभाग, शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ संदर्भात मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल असलेल्या न्यायालयीन निर्णयाच्या अधिन राहुन सदर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(४) पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/कार्या-१२, दि.१२.०९.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयामधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(५) संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी पदोन्नत अधिकाऱ्यांस तात्काळ कार्यमुक्त करावे. पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर रुजू होऊन, तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२५१५०७३९८२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55FDD77FA8877B50FD182206F763C590C30CE698809F79D37B145FD63E375059, cn=C PRIYANKA
Date: 2023.07.25 15:08:22 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रति,**

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, अमरावती विभाग, अमरावती.
जिल्हाधिकारी, अमरावती.
आयुक्त तथा प्रशासक, अकोला महानगरपालिका.
श्रीमती गिता वंजारी, सहायक आयुक्त, गट-ब, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती.

**प्रतिलिपी,**

मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नवि-१)/(नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
निवडनस्ती (नवि-१४)